**राज्यातील गुइलेन बॅरे सिंड्रोम (जीबीएस) तसेच अन्य साथच्या रोगांचा वाढता प्रादुर्भाव विचारात घेता पाण्याचे निर्जंतुकीकरण करून पाणी पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्र. डब्ल्यूक्यूएम २०२५/प्र.क्र. २९/पापु- १२**
नवीन मंत्रालय इमारत सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
दिनांक -१२ फेब्रुवारी २०२५.

वाचा - १) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. डब्ल्यूक्यूएम २०१८/प्र.क्र.६२/पापु- १२, दि.२० जुलै २०२२.
२) शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. डब्ल्यूक्यूएम २०१९/प्र.क्र.८५/पापु- १२, दि.०२ फेब्रुवारी २०२२.
३) मा.मुख्य सचिव यांची दि.०६ फेब्रुवारी २०२५ रोजीची टिप्पणी.

**प्रस्तावना :-**

मा. केंद्रीय आरोग्य मंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.०३/०२/२०२५ रोजी गुइलेन बॅरे सिंड्रोम (जीबीएस) चा प्रादुर्भावाच्या अनुषंगाने उपाययोजना करणे या विषयावरील बैठक पार पडली. सदर बैठकीस राज्य शासनाचे मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता तसेच अन्य वरिष्ठ अधिकारी उपस्थित होते. राज्यामध्ये उद्भवलेल्या जी.बी.एस च्या प्रादुर्भाव नियंत्रणात आणण्याकरीता आरोग्य विभागाकडून सर्वतोपरी प्रयत्न केले जात आहेत. यासंदर्भात केंद्र शासनामार्फत राज्याला पूर्ण सहकार्य देऊ केले आहे. तसेच सदर बैठकीमध्ये पुणे शहर व पुणे परिसरामध्ये जी.बी.एस चा प्रादुर्भाव वाढत असल्याने मुख्यत्वे अन्न तपासणी, पाणी तपासणी, स्त्रोत परिसराची स्वच्छता, पाणी पुरवठा योजनांमधील गळती, पिण्याच्या पाण्याचे निर्जंतुकीकरण, स्त्रोतांचे संरक्षण, पिण्याच्या पाण्याची तपासणी व आरोग्याबाबत जनजागृती करणे या बाबींवर तात्काळ कार्यवाही करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत.

०२. राज्यातील काही भागामध्ये तसेच पुणे जिल्ह्यात होणाऱ्या दूषित पाणीपुरवठाच्या समस्येमुळे अतिसाराचे रुग्ण अजूनही आढळून येत आहेत, ज्यामुळे जी.बी.एस.ची लागण झालेल्या रूग्णांच्या संख्येमध्ये वाढ होण्याची शक्यता आहे. केंद्र शासनही प्रदूषित पाण्यामुळे होणाऱ्या संसर्गावर लक्ष ठेवून आहे. मा.मुख्य सचिव यांनीही दि.६/०२/२०२५ च्या टिप्पणीन्वये पुणे विभागातील GBS प्रादुर्भाव असणाऱ्या क्षेत्रामध्ये शुद्ध पाणी पुरवठा होण्याच्या अनुषंगाने क्षेत्रीय कार्यालयांना / संबंधित यंत्रणांना शुद्ध पाणी पुरवठा करण्याच्या दृष्टिने तात्काळ कार्यवाही करण्याबाबत निर्देश देण्याबाबत कळविले आहे.

०३. राज्यातील गुइलेन बॅरे सिंड्रोम (जीबीएस) चा तसेच अन्य साथच्या रोगांचा वाढता प्रादुर्भाव विचारात घेता, पाण्याचे निर्जंतुकीकरण करून पाणी पुरवठा करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय दि.२० जुलै २०२२ व दि.०२ फेब्रुवारी २०२२ ची काटेकोर अमंलबजावणी करण्यासंदर्भात खालील प्रमाणे सुचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक -**

केंद्र शासनाच्या पेयजल व स्वच्छता विभाग, जल शक्ती मंत्रालय, भारत सरकार यांनी दि.२१/०९/२०१९ रोजी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार, प्रत्येक ग्रामीण कुटुंबाला कार्यात्मक घरगुती नळ जोडणीव्दारे (FHTC) पुरेशा प्रमाणात (किमान ५५ लिटर प्रतिदिन प्रति व्यक्ती ) विहित गुणवत्तेचे (BIS: १०५००) पाणी पुरवठा करणे आवश्यक आहे. तसेच जल जीवन मिशन अंतर्गत (पूर्वीचे राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम) ग्रामीण भागातील जनतेला (Household and Public Institution viz. Gram Panchayat building, School, Anganwadi centre, Health centre, wellness centres, etc) सातत्यपूर्वक गुणवत्तापुर्ण (शुद्ध) पिण्याचे पाणी उपलब्ध करून देणे हे महत्वपूर्ण उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. या कार्यक्रमांतर्गत ग्रामीण जनतेला गुणवत्तापूर्ण पिण्याचे पाणी उपलब्ध करून देण्यासाठी राज्यात पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षण कार्यक्रम (Water Quality Monitoring & Surveillance Program ) राबविण्यात येत आहे.

०२. राज्यातील ग्रामीण भागांमध्ये नियमित शुद्ध पाण्याचा पुरवठा करणे व साथरोगांना आळा बसावा याकरिता पाण्याच्या गुणवत्तेचे सनियंत्रण व सर्वेक्षण करणे अत्यंत आवश्यक आहे, ही बाब विचारात घेऊन शासन निर्णय दि. २०/०७/२०२२ अन्वये, जल जीवन मिशन अंतर्गत गुणवत्ता सनियंत्रण आणि सर्वेक्षण कार्यक्रमाच्या प्रभावी अंमलबजावणीबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्याद्वारे गावातील सर्व पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांची (Source) व घरगुती नळ कनेक्शनव्दारे पुरवठा करण्यात योणाऱ्या (FHTC) पाण्याची (किमान दोन नमुने ) रासायनिक तपासणी वर्षातून एकदा व जैविक तपासणी वर्षातून दोनदा प्रयोगशाळेमध्ये करून घेण्याबाबत निर्देश देण्यात आले आहे. तसेच तपासणीनंतर बाधित पाणी नमुन्यांवर गावस्तरावर उपाययोजना करून प्रयोगशाळेत फेरतपासणीसाठी पाठविण्यात येतात. पिण्याच्या पाण्याच्या चाचाणीचा निकाल योग्य येईपर्यंत उपाययोजना करून पाणी तपासणी केली जाते. त्याचप्रमाणे सदरहू शासन निर्णयान्वये प्रत्येक स्तरावरील पाणी गुणवत्ता सनियंत्रण व सर्वेक्षणाच्या जबाबदाऱ्या निश्चित करण्यात आल्या आहेत.

०३. त्याचप्रमाणे शासन निर्णय दि.२/०२/२०२२ अन्वये, ग्रामपंचायत स्तरावर पाणी गुणवत्ता तपासणीकरिता जैविक क्षेत्रीय तपासणी संचाचा (FTK- H2S vials) चा वापर, खरेदी व वितरणाबाबतची कार्यपद्धती निश्चित करण्यात आली आहे. सदरहू शासन निर्णयान्वये, निवड करण्यात आलेल्या सर्व नोंदणीकृत पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोतांची / वितरण बिंदूंच्या (शाळा, अंगणवाडी,घरे इ.) पाणी नमुन्यांची गावातील प्रशिक्षित महिला स्वयंसेवकांमार्फत प्रत्येक महिन्यात एकदा जैविक क्षेत्रीय तपासणी संचाव्दारे (FTK- H2S vials) तपासणी करण्याबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. जीबीएस चा प्रादूर्भाव रोखण्यासाठी सर्व जिल्हा परिषद कार्यालयांनी प्रत्येक गावातील नळ पाणी पुरवठा योजनांचे स्त्रोत शाळा, अंगणवाडी व नळाव्दारे घरामध्ये उपलब्ध होणारे पाणी याच्या जैविक तपासणीसाठी आवश्यक पाणी नमुने अभियान स्वरुपामध्ये गोळाकरून नजिकच्या भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेच्या प्रयोगशाळेमध्ये जमा करावेत. प्रादुर्भाव विचारात घेता प्रयोगशाळांनी जैविक तपासणी प्राधान्याने करून त्याबाबतचा अहवाल जिल्हा परिषद कार्यालयांकडे तात्काळ द्यावा.

०४. जीबीएस चा प्रादूर्भाव रोखण्यासाठी पंचायत विभाग, आरोग्य विभाग, शिक्षण विभाग, पाणी पुरवठा विभाग यांच्या समन्वयाने वरील सूचनांची अंमलबजावणी अभियान स्वरुपात करून जीबीएस व इतर कोणत्याही साथरोगाचा प्रादुर्भाव होणार नाही याची दक्षता घेण्याबाबत तसेच पाण्याचे निर्जंतुकीकरण करून पाणी पुरवठा करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय दि.२०/०७/२०२२ व शासन निर्णय दि. २/०२/२०२२ अन्वये देण्यात आलेल्या सुचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी. क्षेत्रीयस्तरावरील जबाबदार अधिकारी / कर्मचारी यांनी याबाबत अधिक दक्ष राहावे. याबाबतीत निष्काळजीपणा अथवा कुचराई झाल्याचे आढळुन आल्यास संबंधित कर्मचारी / अधिकारी यांचे सर्वेक्षण अधिकारी यांनी संबंधित कर्मचारी / अधिकारी यांच्यावर "कामात कुचराई केल्याप्रकरणी शिस्तभंगाची शिक्षा" प्रस्तावित करावी. क्षेत्रीय कार्यालयांनी याबाबतचा मासिक अहवाल अभियान संचालक, जल जीवन मिशन ,राज्य पाणी व स्वच्छता मिशन , बेलापुर, नवीमुंबई यांच्या कार्यालयाकडे संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत सादर करावा. तसेच राज्य पाणी व स्वच्छता मिशन कार्यालयाने याबाबतचा एकत्रित मासिक अहवाल राज्य शासनाकडे सादर करावा.

०५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०२१२१६२४१२१६२८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NIWRUTTI DHAS

Digitally signed by ANIL NIWRUTTI DHAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=699d21cc89897191099434d443603426329c81b1b292ed2d168c892811118cc7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F85F1C64C05886C8D514E40D54D27FF3A80FFD907A05433B1C412B7F7FFA0AFD, cn=ANIL NIWRUTTI DHAS
Date: 2025.02.12 16:25:33 +05'30'

(अनिल धस)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
४. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव महाराष्ट्र राज्य मंत्रालय मुंबई.
५. मा.प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
७. मा.मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
८. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई.
९. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकारण,मुंबई.
१०. अभियान संचालक, जल जीवन मिशन, राज्य पाणी व स्वच्छता मिशन बेलापूर नवी मुंबई.
११. आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा पुणे.
१२. जिल्हाधिकारी (सर्व).
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद (सर्व).
१४. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).

१५. अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१६. कार्यकारी अभियंता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (सर्व).
१७. सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा पुणे.
१८. प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा (सर्व प्रादेशिक विभाग).
१९. उपसंचालक, आरोग्य सेवा राज्य आरोग्य प्रयोगशाळा पुणे.
२०. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणीपुरवठा विभाग जिल्हा परिषद (सर्व).
२१. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
२२. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, पाणी व स्वच्छता, जिल्हा परिषद (सर्व).
२३. उपमुख्य कार्यकारी अधिकारी, ग्रामपंचायत,जिल्हा परिषद (सर्व).
२४. गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व).
२५. निवडनस्ती कार्यासन पापु -१२.